राज्यातील आदिवासी क्षेत्रामध्ये राबविण्यात कन्यादान योजनेतंर्गत देणाऱ्या येणाऱ्या अनुदानात वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आविवि-०१२४/प्र.क्र.११/का-८,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.सावियो-२००३/प्र.क्र.१७९/का-०८ दि.०३.०३.२००४
२. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. सावियो-२००३/प्र.क्र.१७९/का-०८ दि.१८.०२.२००९
३. मा. मुख्यमंत्री कार्यालयाकडून दि.०१.०१.२०२४ रोजी प्राप्त टिप्पणी
४. मा.मंत्रिमंडळ यांची दि.१३/०३/२०२४ रोजी पार पडलेली बैठक

**प्रस्तावना :-**

वाचा येथील अनु.क्र. १ च्या दि.०३.०३.२००४ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यातील १५ जिल्ह्यांमध्ये कन्यादान योजना राबविण्यात येत आहे. सदर योजना राबवून जवळपास २० वर्षाचा कालावधी झाल्याने सदर योजनेच्या अनुदानात वाढ करण्याची मागणी क्षेत्रीय कार्यालयाकडून प्राप्त होत होती. मा. मुख्यमंत्री कार्यालय यांच्याकडील दि.०१.०१.२०२४ रोजी प्राप्त टिप्पणीन्वये कन्यादान योजनेच्या अनुदानात वाढ करण्याच्या अनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करण्याची विनंती करण्यात आली होती.

शुभमंगल सामुहिक/नोंदणीकृत विवाह योजना अंतर्गत लाभार्थ्यांना देण्यात येणा-या अनुदानात वाढ करण्याबाबत महिला व बाल विकास विभागाच्या प्रस्तावावर दि.१३/०३/२०२४ रोजी पार पडलेल्या मा.मंत्रिमंडळाच्या बैठकित चर्चा होऊन आदिवासी विकास विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, बहुजन कल्याण विभाग तसेच इतर विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या उपरोक्त योजनेशी समरुप असलेल्या विवाह योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या अनुदानात महिला व बाल विकास विभागाने घेतलेल्या निर्णयानुसार वाढ करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार कन्यादान योजनेच्या अनुदानात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी विकास विभागाकडून राबविण्यात येणाऱ्या कन्यादान योजनेतंर्गत देण्यात येणाऱ्या अनुदान रक्कमेत या शासन निर्णयान्वये पुढीलप्रमाणे वाढ करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | रक्कम रु. |
|---|---|---|
| १ | सामुहिक विवाह सोहळयात सहभागी होऊन विवाह करणाऱ्या अनुसूचित जमातीच्या जोडप्यांना | रु.२५,०००/- |
| २ | सामूहिक विवाह सोहळयाचे आयोजन करण्यासाठी सेवाभावी संस्था/यंत्रणा यांना | प्रत्येकी जोडप्यामागे रु.२५००/- |

१. सामुहिक विवाह सोहळयात सहभागी होऊन विवाह करणाऱ्या अनुसूचित जमातीच्या जोडप्यांना रू.२५,०००/- इतकी अनुदानाची रक्कम थेट लाभार्थी हंस्तातरण (DBT) पद्धतीने लाभार्थ्यांच्या खाती जमा करण्यात यावी.

२. सदर योजना ही जिल्हा स्तरावर राबविण्यात येत असून यासाठी होणारा खर्च हा जिल्हा आदिवासी घटक कार्यक्रमाखाली करण्यात यावा. जिल्ह्यांनी सदर योजनेसाठी जिल्हा आदिवासी घटक कार्यक्रमाखाली आवश्यक ती तरतूद करावी.

३. सदर योजनेंतर्गत लाभ घेतलेल्या लाभार्थ्यांना शासनाच्या अन्य विभागांकडून राबविण्यात येणा-या सामुहिक विवाह योजनेंतर्गत लाभ मंजुर करता येणार नाही.

४. सदर योजना ही संपूर्ण राज्यात राबविण्यात यावी.

**२. सदर शासन निर्णय हा मा.मंत्रिमंडळाच्या दि.१३/०३/२०२४ रोजीच्या बैठकितील घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.**

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१५२११२०५१६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CE18732734BA0742D7712775E8F0AD400558E8748375399762FD447C3E9AC1EB, cn=SATISH VITHALRAO KOVE
Date: 2024.03.15 21:21:28 +05'30'

**( सतिश कोवे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
१०. मा. सर्व मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. अ.मु.स./प्र.स./ सचिव, विभाग सर्व, मंत्रालय मुंबई.
१२. सर्व विभागीय आयुक्त.
१३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१४. व्यवस्थापकीय संचालक,शबरी आदिवासी वित्त व विकास मंहामंडळ,नाशिक
१५. व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ
१६. आयुक्त,आदिवासी संशोधन व प्रसिक्षण संस्था,पुणे
१७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
१८. सर्व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१९. उप सचिव/अवरसचिव/कक्ष अधिकारी,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
२०. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२१. निवड नस्ती / (का-०८), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.